सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता "डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकाचे आधुनिकीकरण व बळकटीकरण" आणि "उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती"(२४०६८६१३) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्रशासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०१९/प्र.क्र.५०/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : १२ डिसेंबर, २०१९**

वाचा:-

१) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक- अर्थसं-२०१९/प्र.क.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.११/५५६ /२०१९- २०,दि. ०८.०७.२०१९

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक साववि-२०१९/प्र.क्र.८६/ फ-११, दि. २२.०७.२०१९

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.११/७२२ /२०१९- २०,दि. २६.०७.२०१९ चे पत्र.

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.११/१३८७ /२०१९- २०,दि. ०९.१२.२०१९

प्रस्तावना:-

डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मितीसाठी खालीलप्रमाणे निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

| **डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोपवाटीका बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मितीसाठी (५०- इतर खर्च)** | **मंजूर निधी (रु.लक्ष)** | **६० % च्या मर्यादेत वितरित निधी (रु.लक्ष)** |
|---|---|---|
| मुळ अर्थसंकल्पित रक्कम | २०००.०० | १२००.०० |
| पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित (जुलै २०१९) | २१६०.०० | ०.०० |
| **एकूण** | **४१६०.००** | **१२००.००** |

२. सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सन २०१९-२० करिता सदर योजनेंतर्गत एकूण रु.४७३९.५९ लक्ष रकमेचा मागणीचा चालू बाब प्रस्ताव संदर्भ क्र. २ अन्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर यांनी शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने सदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये रु. १२००.०० लक्ष निधी वितरित करण्यात आला आला आहे. प्रधान मुख्य

वनसंरक्षक, ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा. नागपूर यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये रु.१२९६.०० लक्ष अनुदान वितरित करण्याची विनंती करण्यात आली आहे.

३. सदर योजनेकरिता पुरवणी मागणीद्वारे रु. २१६०.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त व नियोजन विभागाने त्यापैकी ६० % मर्यादेत रक्कम रु.१२९६.०० लक्ष निधी,सन २०१८-१९ वर्षामध्ये या योजनेकरिता वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन वितरित करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार प्रधान मुख्य वनसंरक्षक, ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये सन २०१८-१९ मधील वितरित केलेल्या रु.१००८०.०० लक्ष रकमेपैकी रु. ९७७५.९८ लक्ष रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असून रु. ३०४.०२ लक्ष रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केलेले नाही. ज्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केलेले नाही, तेवढया रकमेचा निधी राखून ठेवून उर्वरित रु. ९९१.९८ लक्ष निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या **"डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकाचे आधुनिकीकरण व बळकटीकरण " आणि " उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती " (२४०६८६१३)"** या योजनेसाठी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित निधीच्या (रु. २१६०.००लक्ष च्या ) ६० % मर्यादेत रु.१२९६.०० लक्षपैकी प्रस्तावनेतील परि. क्र.३ मध्ये नमूद केल्यानुसार **रु. ९९१.९८ लक्ष** ( ५०- इतर खर्च) निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) ,महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. **सदर निधी वितरित करण्यापूर्वी प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) यांनी सदर योजनेसाठी, सन २०१८-१९ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे. वितरित केलेला निधी मंडळे/ महामंडळे यांच्या वा इतर बँक खात्यात स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये अथवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडे ठेव अंशदान निधीमध्ये काढून ठेवता येणार नाही.**

४. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत व्हावे.

५. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भिय दिनांक ०८.०७.२०१९ रोजीच्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून खर्ची टाकण्यात यावा.

६. **सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूरअर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.**

"मागणी क्र.सी-७,
२४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत)
(०३) (०४)डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे बळकटीकरण व आधुनिकीकरण-
उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुकास्तरावर रोपवाटीका निर्मिती".
(२४०६८६१३)- ५० इतर खर्च

**७.** सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थसं-३, दि.०८.०७.२०१९ अन्वये तसेच नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमाक १६७/१४७५, दि. ०४.०९.२०१९ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६३९/व्यय-१० दि.१३.९.२०१९ अन्वये विभागास प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२१२१७२८३८४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.12.12 17:31:09 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**
**अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
६. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग,व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती/फ-११.